**राजमाता जिजाऊ माता-बाल, आरोग्य व पोषण मिशनची पुनर्रचना करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन
# महिला व बाल विकास विभाग

शासन निर्णय क्रमांक- एबावि- २०१०/प्र.क्र.१४५/का-५
नवीन प्रशासन भवन, ३ रा मजला
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक १२/११/२०१०.

**वाचा:-** मबावि चा दिनांक ११.०३.२००५ चा शासन निर्णय क्र. एबावि २००५/प्र.क्र.५/का-५

**प्रस्तावना:-** महाराष्ट्र राज्यातील बाल कुपोषण व बालमृत्यु या गंभीर समस्यांना आळा घालण्यासाठी दिनांक ११ मार्च, २००५ रोजी राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य व पोषण मिशनची स्थापना करण्यात आली होती. मिशनला काही अंशी यश मिळाले असून अति कुपोषित मुलांची संख्या सन २००५ मध्ये १७६७२ वरुन २०१० मध्ये ७८७३ पर्यंत कमी झालेली आहे. परंतु अजूनही राज्यात बाल कुपोषणाची समस्या कायम असून व त्याला वेगाने आळा घालण्याची गरज आहे. आतापर्यन्त राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य व पोषण मिशनने ० ते ६ वयोगटातील सर्व बालकांचे कुपोषण कमी करण्यावर भर दिला होता, व विशेषत: अंगणवाडीमार्फत पुरविण्यात येणा-या सेवांवर अधिक लक्ष केन्द्रित करण्यात आले होते.

कुपोषणाच्या कारणांचा सखोल अभ्यास केला असता असे लक्षात येते की, कुपोषण कमी करण्यासाठी गरोदरपणापासून २ वर्षापर्यन्तच्या बालकांवर (-९ महिने ते २ वर्षे) विशेष जास्त लक्ष केन्द्रित करणे आवश्यक आहे, कारण याच कालावधित कुपोषणाची सुरुवात होते, व याच वयोगटात सर्वात अधिक बालमृत्यु होतात. एकात्मिक बालविकास सेवा योजनेंतर्गत (-९ महिने ते २ वर्षे ) गरोदर स्त्रिया आणि २ वर्ष वयापर्यंतच्या बालकांना विविध सेवा पुरविण्यावर नेहमी दुर्लक्ष होते. कारण या गरोदर स्त्रिया आणि २ वर्षापर्यंतची (-९ महिने ते २ वर्षापर्यन्त) बालके अंगणवाडीमध्ये दाखल करता येत नाहीत. म्हणून त्यांच्या आरोग्याची काळजी घरीच व आईमार्फतच घेणे आवश्यक असते. गर्भधारणेपासून ६ महिन्यापर्यन्तच्या मुलांना शासनाच्या पूरक पोषण आहार योजनेचा फायदासुध्दा देता येत नाही, कारण या मुलांना निव्वळ स्तनपान देणेच आवश्यक व हितकारक आहे. यामुळे राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य व पोषण मिशनच्या उद्दिष्टांमध्ये आवश्यक बदल करणे शासनाच्या विचाराधीन होते, जेणे करुन एकात्मीक बाल विकास सेवा, आयुक्तालयामार्फत देण्यात आलेली सेवा व उपक्रम या व्यतिरिक्त पूर्णपणे स्वतंत्र जबाबदाऱ्या मिशनला देता येतील, जेणेकरुन मिशनला "-९ महिने ते २ वर्षे" या गटावर विशेष लक्ष केंद्रित करता येईल.

**शासन निर्णयः-** महाराष्ट्रातील सर्व ग्रामीण/आदिवासी/शहरी एकात्मीक बाल विकास सेवा प्रकल्पाअंतर्गत - ९ महिने ते २ वर्षे वयोगटातील बालकांमधील कुपोषणाचे प्रमाण कमी करण्यासाठी राजमाता जिजाऊ माता बाल आरोग्य व पोषण मिशन कार्यान्वीत झाल्यापासून पुढे ५ वर्षे चालू ठेवण्यात यावे.

**१. मिशनचे प्रमुख उद्दिष्टः-** एकात्मीक बाल विकास सेवा योजने अंतर्गत (-९ महिने ते २ वर्षे) गरोदर स्त्रिया आणि २ वर्षापर्यंतच्या बालकांचे कुपोषण प्रमाण कमी करणे.

**मिशनची पुरक उद्दिष्टये:-**

(अ) एकात्मीक बाल विकास सेवा योजने अंतर्गत ० ते २ वर्षे वयोगटातील मध्यम व तिव्र कमी वजनाच्या बालकांमधील कुपोषणाचे प्रमाण कमी करणे.

(ब) गर्भवती स्त्रियांची प्रसूतीपुर्व काळजी घेणे (कमी वजनाच्या / रक्तक्षय असलेल्या स्त्रियांकडे विशेष लक्ष), नवजात अर्भक काळजी, आणि ० ते २ वर्षापर्यंतच्या वयोगटातील बालकांचे आरोग्य, आहार, वाढ, विकास व लसीकरणाबाबत विशेष लक्ष केंद्रित करणे (-९ ते २ वर्षे वयोगटावर केंद्रीकरण).

(क) राज्यातील काही निवडक जिल्हयातील निवडक प्राथमिक आरोग्य केंद्रामध्ये "नवजात शिशू एकत्रित निदान व उपचार योजना" (IMNCI- Integrated Management of Neonatal & Childhood Illnesses) आणि "नवजात बालक घरपातळी सेवा कार्याक्रम" (Home Based New-born Care) प्रायोगिक तत्वावर राबविण्या करीता आरोग्य विभागास प्रशिक्षण व प्रबलनाव्दारे सहकार्य करणे.

(ड) किशोरवयीन मुलींच्या शिक्षणाकडे विशेष लक्ष देऊन बालविवाहाचे प्रमाण कमी करणे, पहिले गरोदरपण लांबवणे, दोन अपत्यांमधील अंतर वाढविणे आणि कुपोषणाच्या संबंधित सर्व प्रश्नांची तीव्रता कमी करण्याकरीता जनजागृती करणे.

**३. मिशनच्या उद्दिष्टपूर्तीसाठी करावयाचा आवश्यक कृती कार्यक्रम खालील प्रमाणे राहील.**

I. सर्वेक्षण क्षमता तपासणे (एकात्मीक बाल विकास सेवा क्षेत्रांतर्गत व क्षेत्राबाहेरील).

II. गर्भवती स्त्रिया व स्तनदा मातांची पटनोंदणी वाढविणे.

III. बालकांचे सर्वसाधारण श्रेणीत/ कमी वजनाच्या श्रेणीत वर्गीकरण व्यवस्थितपणे करुन घेणे.

IV. ० ते २ वर्षे वयोगटातील बालकांची आरोग्य तपासणी करुन घेणे.

V. गर्भवती स्त्रिया व स्तनदा मातांची नियमित आरोग्य तपासणी करुन घेणे.

VI. जोखमीच्या बालकांची व स्त्रियांची तज्ञामार्फत तपासणी आणि योग्य उपचार करुन घेणे.

VII. मिशनच्या उद्दिष्टपूर्तीसाठी विविध स्तरांवर नियमित आढावा घेणे.

VIII. शाळेत जाणाऱ्या व शाळेबाहेरील सर्व किशोरवयीन मुलींची नोंद घेवून त्यांना प्रत्येक आठवड्यात लोहयुक्त गोळ्या व वर्षातून दोनदा जंतनाशक गोळ्या मिळतात की नाही हे तपासणे.

IX. कमित कमि ७५% महिला गटांना 'मरेगा' खाली व इतर दारीद्रय निर्मूलन कार्यक्रमाखाली सहभागी होता येते की नाही ते तपासणे.

X. २ वर्षे वयापर्यंतच्या ९५% बालकांचे वजन होते की नाही ते तपासणे.

XI. जन्मानंतर एका तासाचे आत सुरवात करुन व ६ महिनेपर्यंत बाळाला निव्वळ स्तनपान होते की नाही हे पाहणे.

XII. ९ महिने ते ५ वर्षात बाळाला वर्षातून २ वेळा व्हिटॅमिन 'अ' चा पुरवठा करुन घेणे व जंतनाशन करणे.

XIII. SAM व MAM बालकांची ग्रामिण बाल विकास केंद्र व बाल विकास केंद्रांत लागू केलेल्या शिष्टाचारानुसार गुणात्मक काळजी घेणे.

४. मिशनची उद्दिष्टे साध्य करण्यासाठी युनिसेफच्या अर्थसहाय्याने "मिशन संनियंत्रण कक्ष" स्थापन करण्यास मान्यता देण्यात येत असून मिशनचे मुख्यालय नवी मुंबई येथे राहील. "मिशन सनियंत्रण कक्ष' महिला व बाल विकास विभागाच्या प्रशासकीय नियंत्रणाखाली कार्यरत राहील व कक्षाची रचना खालीलप्रमाणे राहील.

| अ.क्र. | पदनाम | संख्या | संवर्ग/प्रतिनियुक्ती आदेश निर्गमित करणारा विभाग |
|---|---|---|---|
| १ | महासंचालक | १ | प्रतिनियुक्तीने - सचिव/प्र.सचिव दर्जाचे भा.प्र.से. अधिकारी. |
| १ | संचालक | १ | प्रतिनियुक्ती- म.वि.से. (गट-अ) |
| ३ | उपसंचालक (आहार) | १ | प्रतिनियुक्ती किंवा करार तत्वावर (गट- अ) |
| ४ | उपसंचालक (सनियंत्रण) | १ | प्रतिनियुक्ती किंवा करार तत्वावर (गट- अ) |
| ५ | उपसंचालक (आरोग्य) | १ | प्रतिनियुक्ती किंवा करार तत्वावर (गट- अ) |
| ६ | समन्वयक (प्रशिक्षण) | १ | प्रतिनियुक्ती किंवा करार तत्वावर |
| ७ | व्यवस्थापक (MIS) | १ | प्रतिनियुक्ती किंवा करार तत्वावर |
| ८ | लेखा व्यवस्थापक | २ | प्रतिनियुक्ती किंवा करार तत्वावर |
| ९ | कार्यालयीन कामासाठी पुरक कर्मचारी वर्ग | २ | करार तत्वावर (गट - ड) |
| | एकूण | ११ | |

मिशन संनियंत्रण कक्षासाठी वरील प्रमाणे अधिकारी/ कर्मचाऱ्यांची पदस्थापना संबंधीत विभाग/ स्थानिक स्वराज्य संस्था यांचेकडून प्रतिनियुक्तीने, किंवा करारतत्वावर करण्यात यावी. मिशन संनियंत्रण कक्षामध्ये प्रतिनियुक्तीने पदस्थापना करण्यात आलेल्या अधिकारी/कर्मचारी यांचा त्यांच्या मुळ संवर्गावरील धारणाधिकार कायम असेल.

**शासनाने महासंचालक पदासाठी निवड व प्रतिनियुक्ती केल्यावर महासंचालकांनी इतर पदासाठी, सचिव म.बा.वि. व युनिसेफच्या मदतीने, शोध व निवड पध्दतीने प्रतिनियक्त्या/नियुक्त्या कराव्यात.**

५. **मिशनची जबाबदारी खालीलप्रमाणे राहील**

I. उद्दिष्ट पूर्तीसाठी प्रभावी सनियंत्रण व समन्वयातील उणिवा आणि त्रुटी संबंधीत विभागाच्या निदर्शनास आणून देणे, धोरण निश्चितीसाठी आवश्यकत्या शिफारसी करणे.

II. विविध विभागातील अधिकारी व कर्मचारी यांचे आरोग्य व पोषण संदर्भात प्रशिक्षण. स्थानिक स्वराज्य संस्थांमधील पदाधिकारी, सदस्य यांच्या प्रशिक्षण कार्यशाळांचे नियोजन व अंमलबजावणी करणे.

III. विविधि विभागातील अधिकारी/ कर्मचाऱ्यांच्या प्रभावी समन्वय व सनियंत्रणासाठी आढावा बैठका/कार्यशाळा आयोजित करणे.

IV. प्रत्येक ३ महिन्याचे त्रैमासिक प्रगती अहवाल मा. मुख्यमंत्रयांचे कार्यालय, मा.मंत्री (महिला व बाल विकास विभाग व आरोग्य विभाग) यांचे कार्यालय व संबंधीत विभागांना पाठविणे.

V. मिशनच्या कामाला गती देण्यासाठी गठित केलेल्या ३ समित्यांची वेळोवेळी बैठका आयोजित करणे.

मिशनचे संनियंत्रण व अंमलबजावणी करण्यासाठी **परिशिष्ट** अ मध्ये नमूद केल्याप्रमाणे **(१) मिशन सुकाणू समिती (२) मिशन संनियंत्रण समिती आणि (३) मिशन** सल्लागार समिती, अशा प्रकारे तीन समित्यांची स्थापना करण्यात येत आहे. मिशनचा वार्षिक आढावा मुख्य सचिवांना विशेष बैठक घेवून सादर करण्यात येईल.

६. **मिशनच्या उद्दिष्टपूर्तीसाठी स्थानिक स्वराज्य संस्थांचे सहकार्य अत्यंत महत्वाचे राहणार असून स्थानिक स्वराज्य संस्थांची जबाबदारी खालील प्रमाणे राहील.**

(अ) ग्रामीण व शहरी भागातील स्थानिक स्वराज्य संस्थांनी गरोदर व स्तनदा माता, व २ वर्षे वयोगटातील बालकांचे कुपोषण कमी करण्याकरीता आवश्यक ते लोकप्रतिनिधींचे पाठबळ निर्माण करणे आवश्यक राहील.

(ब) ् पोषणाचे प्रमाण कमी करण्यासाठी स्थानिक स्वराज्य संस्थांच्या निधीमधून गरोदर व स्तनदा मातांना आवश्यक सोई सुविधा, अंगणवाडी केंद्राची इमारत, लोक शिक्षणासाठी जनजागृती, प्रचार व प्रसिध्दी किंवा इतर आवश्यक बाबीसाठी तरतूद उपलब्ध करुन द्यावी.

७ राजमाता जिजाऊ माता बाल, आरोग्य व पोषण मिशनच्या पुढील कार्यवाहीसाठी महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई हा 'नोडल' विभाग म्हणून काम करेल. मिशनने केलेल्या कामाचे स्वतंत्र यंत्रणेव्दारे मूल्यमापन करण्यात येईल.

८. महाराष्ट्र शासनाच्या, राज्यातील बालकांचे कुपोषण कमी करणे या महत्वाकांक्षी धोरणाची अंमलबजावणी करण्यासाठी सर्व संबंधीत विभागाच्या अधिकारी / कर्मचाऱ्यांनी आणि स्थानिक स्वराज्य संस्थांच्या लोकप्रतीनीधींनी / पदाधीकाऱ्यांनी या मिशनची उद्दिष्टे साध्य करण्यासाठी सर्वतोपरी प्रयत्न आणि सहकार्य करणे अपेक्षीत आहे.

९. **सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईट WWW.maharashtra.gov.in वर उपलब्ध आहे.**

201109281636620001 महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

(वंदना कृष्णा)
प्रधान सचिव
महाराष्ट्र शासन

**प्रतिः-**

मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन, मुंबई.
मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. उपमुख्यमंत्र्यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (वैद्यकीय शिक्षण) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (ग्रामविकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (आदिवासी विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (अन्न व नागरी पुरवठा) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (रोजगार हमी) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. मंत्री, (सहकार) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
मा. राज्यमंत्री, (महिला व बाल विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.
अप्पर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
अप्पर मुख्य सचिव, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सामाजिक न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
प्रधान सचिव, सहकार विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, कुटूंब कल्याण, मंत्रालय, मुंबई.
सचिव, वैद्यकीय शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, अन्न, नागरी पुरवठा व ग्राहक संरक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, रोजगार व स्वयंमरोजगार, मंत्रालय, मुंबई.
सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे.
संचालक, सार्वजनीक आरोग्य संचालनालय, मुंबई.
आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
सर्व विभागीय आयुक्त.
सर्व जिल्हाधिकारी.
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद.
महालेखापाल, महाराष्ट्र १ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) मुंबई.
महालेखापाल, महाराष्ट्र २ (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा) नागपूर.
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
उपमुख्य कार्यकारी अधिकारी (बाल कल्याण) जिल्हा परिषद सर्व.
मुख्यलेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, कोकण भवन, नवी मुंबई.
सहसचिव, महिला व बाल विकास.
प्रधान सचिव, महिला व बाल विकास यांचे स्वीय सहाय्यक.
युनिसेफ, मुंबई. (पत्राव्दारे).
राज्य समन्वयक, प्रकल्प नियोजन व नियंत्रण कक्ष, (युनिसेफ), महिला व बाल विकास विभाग.
सर्व कार्यासने, महिला व बाल विकास विभाग.
निवड नस्ती कार्यासन - ५.

# परिशिष्ट अ

**शासन निर्णय क्रमांक- एबावि- २०१०/प्र.क्र.१४५/का-५ दिनांक १२/११/२०१०.**

## (१) मिशन सुकाणू समिती

| | | |
|---|---|---|
| मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य | : | अध्यक्ष |
| मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य | : | उपाध्यक्ष |
| मा. मंत्री, (महिला व बाल विकास) | : | सदस्य |
| मा. मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण) | : | सदस्य |
| मा. मंत्री, (वैद्यकीय शिक्षण) | : | सदस्य |
| मा. मंत्री, (ग्रामविकास) | : | सदस्य |
| मा. मंत्री, (आदिवासी विकास) | : | सदस्य |
| मा. मंत्री, (अन्न व नागरी पुरवठा) | : | सदस्य |
| मा. मंत्री, (सामाजिक न्याय) | : | सदस्य |
| मा. मंत्री, (पाणी पुरवठा व स्वच्छता) | : | सदस्य |
| मा. मंत्री, (रोजगार हमी) | : | सदस्य |
| मा. मंत्री, (सहकार) | : | सदस्य |
| मा. मुख्य सचिव | : | सदस्य |
| सर्व संबंधित विभागाचे सचिव | : | निमंत्रित |
| महासंचालक - मिशन | : | सदस्य सचिव |

# परिशिष्ट अ
## (२) मिशन संनियंत्रण समिती

| | |
|---|---|
| मा.मंत्री (महिला व बालविकास ) | : अध्यक्ष |
| मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण ) | : सदस्य |
| मा.मंत्री (ग्रामविकास ) | : सदस्य |
| मा.मंत्री (आदिवासी विकास ) | : सदस्य |
| मा.मंत्री (नागरी विकास) | : सदस्य |
| मा.राज्यमंत्री (महिला व बाल विकास) | : सदस्य |
| प्रधान सचिव/सचिव((महिला व बाल विकास) | : सदस्य |
| प्रधान सचिव/सचिव (सार्वजनिक आरोग्य व कुटूंब कल्याण ) | : सदस्य |
| प्रधान सचिव/आयुक्त (कुटुंब कल्याण) | : सदस्य |
| प्रधान सचिव/सचिव (ग्रामविकास ) | : सदस्य |
| प्रधान सचिव/सचिव (आदिवासी विकास ) | : सदस्य |
| प्रधान सचिव/सचिव (नगर विकास) | : सदस्य |
| मिशन सल्लागार | : सदस्य |
| मिशन संचालक | : सदस्य सचिव |

इतर मंत्री किंवा सचिवांना आवश्यकतेपमाणे निमंत्रित म्हणून बोलाविण्यात येईल.
या समितीची वर्षातून एक वेळा बैठक घेण्यात यावी.

# परिशिष्ट अ

## (३) मिशन सल्लागार समिती

| | |
|---|---|
| अपर मुख्य सचिव /सचिव (सार्व.आरोग्य) | : अध्यक्ष |
| सचिव (महिला व बाल विकास) | : सदस्य |
| सचिव / आयुक्त (कुटुंब कल्याण) | : सदस्य |
| सचिव (ग्राम विकास विभाग ) | : सदस्य |
| सचिव (नागरी  विकास विभाग) | : सदस्य |
| सचिव/आयुक्त (आदिवासी विकास ) | : सदस्य |
| युनिसेफ प्रतिनिधी | : सदस्य |
| आयुक्त, एकात्मिक बालविकास सेवा योजना | : निमंत्रित |
| अतिरिक्त संचालक, कुटुंब कल्याण, पुणे | : निमंत्रित |
| मिशन संचालक | : सदस्य सचिव |

सचिवांना/अधिका-यांना  आवश्यकतेपमाणे निमंत्रित म्हणून बोलाविण्यात येईल.
या समितीची वर्षातून कमीत कमी दोन वेळा बैठक घेण्यात यावी.